परिवहन आयुक्त कार्यालयातील वाहनांच्या विमा हप्त्याच्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०३२३/प्र.क्र.१११/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : २८ मार्च, २०२३

वाचा :-

परिवहन आयुक्त, परिवहन आयुक्त कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र- पआका/वाहनविमा/का.१०/२०२३/जा.क्र.३१३६ दि.०३.०३.२०२३.

**प्रस्तावना :-**

परिवहन आयुक्त कार्यालयातील वाहन क्र.MH०४EP-५५५५, MH०४EP-१२३४, MH०४EP-००३३, MH०२EU-६४९३, MH०२EU-६४९४ या पाच वाहनांचा सन २०२२-२३ या वर्षाकरीता वाहन विमा हप्ता रक्कमेस प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

परिवहन आयुक्त कार्यालयातील वाहन क्र.MH०४EP-५५५५, MH०४EP-१२३४, MH०४EP-००३३, MH०२EU-६४९३, MH०२EU-६४९४ या पाच वाहनांचा सन २०२२-२३ या वर्षाकरीता वाहन विमा हप्ता रक्कम रु.४३,५९६/- (अक्षरी रु.त्रेचाळीस हजार पाचशे शहाण्णव फक्त) इतक्या रकमेची देयके अदा करण्यासाठी या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी येणारा खर्च मागणी क्र. “बी-३, मुख्य लेखाशिर्ष २०४१, वाहनांवरील कर, ००, ००१, संचालन व प्रशासन - ०१, परिवहन आयुक्त (०१)(०१),आस्थापना- परिवहन आयुक्त (दत्तमत्त)(अनिवार्य) १३ कार्यालयीन खर्च २०४१००१८-१३” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०२२-२३ या वित्तीय वर्षीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग -२, अनुक्रमांक १, नियम क्र.२ व ७ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३२८१९३०२४८९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LANGHI
BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, pseudonym=B2922612E606733B1ABC8BE253ADA57B2D4704C4, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=LANGHI BHARAT R
Date: 2023.03.28 19:34:59 +05'30'

**( भरत लांघी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल ( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई /नागपूर
२. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. परिवहन उप आयुक्त (निरीक्षण/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
६. निवडनस्ती (परि-४).